तात्काळ / अर्थसंकल्प प्राथम्य सन २०२१-२०२२ मधील निधी वितरण.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०३ फेब्रुवारी, २०२२.

पहा :- १) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. ६ एप्रिल, २०२१.
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. २४ जून, २०२१.
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक-२०२१/प्र.क.७८/अर्थ-३,दि. २० जुलै, २०२१.
३) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. २९ जुलै, २०२१.
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क.४८/अर्थ-३,दि. १४ ऑक्टोबर, २०२१.
५) वित्त विभाग,शासन शुध्दीपत्रक,क्र.अर्थसं -२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि. २१ ऑक्टोंबर, २०२१.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. पूरक-२०२१/प्र.क्र.१०६/अर्थ-३, दि. ३ जानेवारी, २०२२.
७) वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ -३,दि.२८जानेवारी,२०२२

## परिपत्रक

कोविड-१९ या संसर्गजन्य रोगाच्या प्रादूर्भावामुळे सन २०२१-२२ या वित्तीय वर्षात राज्याची कर व करेतर उत्पन्नातील अपेक्षित महसूली घट व त्याचे राज्याच्या वित्तीयव्यवस्थेवर होणारे परिणाम विचारात घेता वित्तीय उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने शासन निर्णय, वित्त विभाग, दि. १४ ऑक्टोबर, २०२१ नुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या प्रथम नऊमाही करीता अनिवार्य खर्चासाठी २१- पुरवठा व सामग्री, २६-जाहिरात व प्रसिध्दी,३१-सहायक अनुदाने(वेतनेतर), ३२-अशंदाने व ३३-अर्थसहाय्य या बाबी वगळून अन्य उदिष्टांत एकूण वार्षिक तरतूदीच्या ७५% व कार्यक्रम खर्चासाठी ६०% तसेच आमदार स्थानिक विकास कार्यक्रम व जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण /अनुसूचित जाती व आदिवासी घटक कार्यक्रम ) यासाठी १०० टक्केच्या मर्यादेत निधी वितरीत करण्यास सहमती देण्यात आली आहे. तसेच, उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक २८.०१.२०२२ अन्वये भांडवली लेख्यातील कार्यक्रम व अनिवार्य खर्चाच्या बाबींसाठी १०० टक्के निधी उपलब्ध करून देण्यास मान्यता देण्यात आलेली आहे.

२. सन २०२१-२२ चे सुधारीत अंदाज निश्चित करण्याची कार्यवाही सुरु असून सुधारीत अंदाज निश्चित होईपर्यंतच्या कालावधीसाठी विभागास आवश्यक असणाऱ्या खर्चासाठी निधीची गरज लक्षात घेता महसूली लेख्यातील अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या बाबींची पुढील प्रमाणे निधी वितरणाची मर्यादा निश्चित करण्यात येत असून त्याप्रमाणे निधी अर्थसंकल्पीय अंदाज, वाटप आणि सनियंत्रण प्रणालीवर (बीम्स) वितरीत करण्यास सहमती देण्यात येत आहे:-

| उद्दिष्ट | निधी वितरणाची टक्केवारी | उद्दिष्ट | निधी वितरणाची टक्केवारी |
|---|---|---|---|
| ०१-वेतन | ९५ % | २४- पेट्रोल, तेल व वंगण | ७५ % |
| ०२- मजुरी | ९५ % | २५-पोशाख, राहुटी व भांडारे | ७० % |
| ०३-अतिकालिक भत्ता | ८० % | २७-लहान बांधकामे | ७५ % |
| ०४- निवृत्तीवेतन विषयक खर्च | १०० % | २८-व्यावसायिक सेवा | ८५ % |
| ०६-दुरध्वनी, वीज व पाणी देयक | ९० % | २९-वस्तुच्या विक्रीसाठी खरेदी (दुध इत्यादी) | ९० % |
| १०-कंत्राटी पध्दतीवर घेतलेल्या सेवेवरील खर्च | ९० % | ३४-शिष्यवृत्त्या व विद्यावेतने | ८५ % |
| १३-कार्यालयीन खर्च | ९० % | ३६- सहायक अनुदाने (वेतन) | ९५ % |
| १४-भाडेपट्टी व कर | ९० % | ४१-गुप्त सेवा खर्च | ६० % |
| १८-सुट्टीच्या दिवसाची भरपाई | ७५ % | ४५-व्याज | १०० % |
| १९- आहार खर्च | सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग- (१००%), इतर विभाग-(७५%) | ५७- पशुधन | ७५ % |
| २०-इतर प्रशासकीय खर्च | ६० % | ६०-इतर भांडवली खर्च | ७५ % |
| २१-पुरवठा व सामग्री | सार्वजनिक आरोग्य विभाग व वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग- (१००%), इतर विभाग- (७५%) | ७२-यंत्र सामग्री व उपकरणे यांची देखभाल व दुरुस्ती | ९० % |
| २२-शस्त्र व दारुगोळा | ८५% | | |

अ) उर्वरित उद्दिष्टांकरीता निधी वितरणाचे प्रस्ताव ठोस समर्थनासह व उपलब्ध निधी खर्च झाल्याची खात्री करुन आवश्यकतेनुसार नियोजन विभाग / सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग / आदिवासी विकास विभाग यांच्यामार्फत वित्त विभागाकडे दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२ पर्यंत सादर करण्यात यावेत. दिनांक १५ फेब्रुवारी, २०२२ नंतर प्राप्त होणारे प्रस्ताव स्विकारले जाणार नाहीत, याची नोंद सर्व विभागांनी घ्यावी.

ब) केंद्र पुरस्कृत/ बाह्य सहाय्यित योजनेतील केंद्र हिश्याच्या व राज्य हिश्याच्या निधी वितरणाची मर्यादा १०० % करण्यात येत आहे.तथापि, या संदर्भात प्रत्यक्ष निधी वितरीत करतांना दिनांक १४ ऑक्टोंबर, २०२१ च्या शासन निर्णयातील तरतूदी लागू राहतील. जुलै, २०२१ व डिसेंबर, २०२१ मधील पुरवण्या मागण्यांचा निधी वितरीत करण्यापूर्वी त्यास आवश्यकतेनुसार नियोजन विभाग / सामाजिक न्याय विभाग / आदिवासी विकास विभाग तसेच वित्त विभागाची मान्यता पुरवणी मागणीच्या मुळ नस्तीमधून घेण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे निधी वितरीत करण्यापूर्वी दिनांक १४ ऑक्टोबर, २०२१ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील सूचना लक्षात घेऊन निधी वितरीत करण्यात यावा.

४. अर्थसंकल्पीय तरतूदीत होणारी बचत महाराष्ट्र राजकोषीय उत्तरदायित्व व अर्थसंकल्पीय व्यवस्थापन नियमांतर्गत निर्धारीत केलेली वार्षिक लक्षे साध्य करण्यासंदर्भात उपयुक्त ठरणार असल्याने अर्थसंकल्पीत तरतूदींचे पुनर्विनियोजन करण्याच्या प्रशासकीय विभागांच्या अधिकारांना स्थगिती देण्यात येत असून प्रशासकीय विभागांनी पुनर्विनियोजनासंदर्भात अनिवार्य खर्चासाठी वित्त विभागाची व कार्यक्रम खर्चासाठी आवश्यकतेनुसार नियोजन / सामाजिक न्याय / आदिवासी विकास विभाग व वित्त विभागाची मान्यता घेतल्याशिवाय निधीचे पुनर्विनियोजन करु नये. तसेच यापूर्वी निधी आहरित करुन बँक / स्वीय प्रपंजी खात्यात ठेवला असल्यास असा खर्च न होणारा निधी शासन खाती जमा करण्यात यावा.

५. प्रशासकीय विभागांना उपरोक्त मर्यादेमध्ये उपलब्ध करुन दिलेला निधी त्यांच्या अधिनस्त असलेल्या क्षेत्रीय कार्यालयांना वा प्रशासकीय विभागांना वितरीत करताना हा निधी निश्चितपणे खर्च होईल याची खात्री करावी. **सदर निधी कोणत्याही परिस्थितीत खर्च न होता त्यांच्या अधिनस्त क्षेत्रिय अधिकारी / मंडळे / महामंडळे यांच्या बँक खात्यात, स्वीय प्रपंजी खात्यात अथवा शासकीय लेख्याबाहेर ठेवता येणार नाही.**

६. वरील प्रमाणे प्रशासकीय विभागांनी निधीचे वितरण करतांना तसेच तो खर्च करतांना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियम पुस्तिका व वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेमध्ये उल्लेख केलेल्या तसेच नियोजन व वित्त विभागाने यापूर्वी निर्गमित केलेल्या मार्गदर्शक सूचना व प्रचलित निकष, वित्तीय अधिकारांचे प्रत्यायोजन तसेच वित्त विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

७. या व्यतिरिक्त, या आर्थिक वर्षाच्या अखेरीस खरेदी करावयाच्या प्रस्तावासंदर्भातील कार्यवाहीबाबत वित्त विभागाकडून वेळोवेळी देण्यात आलेल्या व येणाऱ्या सूचनांचे काटेकोरपणे पालन करावे.

८. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२२०२०३१५१६४३४८०५ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Krishna Patil

Digitally signed by Vasant Krishna Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=56462e610dbf070fe5eefa98886b167556f80b373181ed680e4c9c879d7e3617, serialNumber=14caf70544d4d2fb25d1da6ed673b0488e940d807179c09470fcdd9192ba4ce7, cn=Vasant Krishna Patil
Date: 2022.02.03 15:17:26 +05'30'

**( व. कृ. पाटील )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव.
२) मा मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव.
३) मा.विरोधी पक्षनेता,(विधानपरिषद /विधानसभा),महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई.
४) सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
५) सर्व अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
७) सह सचिव / उप सचिव (अर्थसंकल्प शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८) विशेष आयुक्त, महाराष्ट्र सदन, कोपर्निकस रोड, नवी दिल्ली-११०००१.
९) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१०) प्रधान महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
११) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
१२) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१३) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
१४) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१५) सर्व सह सचिव / उप सचिव / अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) निवड नस्ती, अर्थसंकल्प-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.